महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत फिरत्या वाहनाच्या (मोबाईल व्हॅन) माध्यमातून जन-जागृती करण्यासाठी पुणे जिल्हयाकरिता दोन मोबाईल व्हॅनची अधिक तरतूद करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयईसी-२०१५/प्र.क्र.५२ /रोहयो-६ब**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
तारीख: २५ मार्च,२०१५

**वाचा :**

**शासन निर्णय क्रमांकः आयईसी-२०१५/प्र.क्र.५२ /रोहयो-६ब, दि. २० मार्च, २०१५**

**प्रस्तावना :**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत फिरत्या वाहनाच्या (मोबाइल व्हॅन) माध्यमातून पुणे व औरंगाबाद विभागांमध्ये जन-जागृती करण्याबाबतच्या सविस्तर सुचना उपरोक्त वाचा येथे नमूद दि. २० मार्च २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत.

सदर शासन निर्णयामध्ये पुणे विभागातील पुणे जिल्ह्याकरिता १९५ गावांप्रमाणे ४ व्हॅन्स ऐवजी २ व्हॅन्सची तरतूद नजरचुकीने करण्यात आली होती. यास्तव पुणे जिल्ह्यास दोन अधिक मोबाइल व्हॅन्स उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :

## शासन निर्णय:

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत होणारी विविध कामे तसेच क्षेत्रीय स्तरावर जलयुक्त शिवार अभियान व्यापक दृष्ट्या लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी पुणे जिल्ह्याकरिता अधिक दोन मोबाईल व्हॅन्सला मंजुरी देण्यात येत आहे. तसेच, त्यासाठी येणाऱ्या रु. ३,२२,२००/- (अक्षरी रु. तीन लाख बावीस हजार दोनशे फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्चाचे विवरण खालीलप्रमाणे आहे:-

**तक्ता क्र.१**

**अ) एका व्हॅनसाठी येणारा अंदाजित खर्च (कालावधी १ महिना)**

| अ.क्र. | तपशील | अंदाजे खर्च | एकूण खर्च |
|---|---|---|---|
| १ | भाडेतत्वावर व्हॅन घेणे (मेंटेनन्स, टोल, इंधन इ. सह) | रु.३०,०००/- प्रती महिना | रु. ३०,०००/- |
| २ | प्रोजेक्टर (स्क्रीनसह) भाडेतत्वावर घेणे (२६ दिवस) | रु. १५००/- प्रती दिवस | रु. ३९,०००/- |
| ३ | डीव्हीडी प्लेयर भाडेतत्वावर घेणे (२६ दिवस) | रु. ५००/- प्रती दिवस | रु. १३,०००/- |
| ४ | ऑडिओ सिस्टम-माईक, स्पीकर इ भाडेतत्वावर घेणे (२६ दिवस) | रु. ५००/- प्रती दिवस | रु. १३,०००/- |
| ५ | बॅटरी बॅकअप (मिनी जनरेटर) (२६ दिवस) | रु. ६००/- प्रती दिवस | रु. १५,६००/- |
| ६ | व्हॅन सजावट (पॅनेल छपाईसह) (जिल्हा स्तरावर) एकदा करावयाचा खर्च | रु .१०,०००/- | रु. १०,०००/- |
| | **एकूण खर्च** | | **रु .१,२०,६००/-** |

**पुणे जिल्ह्यातील अधिक २ मोबाईल व्हॅन्सकरिता येणारा खर्च (कालावधी १ महिना):- १,२०,६०० x २ व्हॅन्स= रु. २, ४१, २००/- (अक्षरी रु. दोन लाख एकेचाळीस हजार दोनशे फक्त) इतका राहील.**

**तक्ता क्र. २**

**ब) मोबाईल व्हॅनमधील आयईसी साहित्यासाठी लागणारा अंदाजित खर्च:**

| अ.क्र. | तपशील | संख्या | यूनिट खर्च | एकूण खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | प्रदर्शन संच (स्टँडीज)- २० विषयांवर (१० नरेगा + १० जलसंधारण) | २ व्हॅन | रु. २०००/- प्रती स्टँडी x २० स्टँडीज =४००००/- | रु. ८०,००० |
| २ | डीव्हीडीज (शैक्षणिक माहितीपट, जिंगल्स, स्पॉट्स इत्यादि) प्रत्येकी ५ डीव्हीडीज (१ यशोगाथा, २ शैक्षणिक व २ TVC व ऑडिओ स्पॉट्स) x २ वाहने | १० डीव्हीडी | रु. १००/- | रु . १,००० |
| | **एकूण खर्च (पुणे जिल्ह्यासाठी)** | | | **रु. ८१,०००/-** |

तक्ता क्र.३

क) २ मोबाईल व्हॅनद्वारे प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी पुणे जिल्हयाकरिता येणारा खर्च (कालावधी- एक महिना)

| अ.क्र. | तपशील | अंदाजे खर्च |
|---|---|---|
| अ | २ मोबाईल व्हॅनचा खर्च | **रु .२,४१,२००** |
| ब | जिल्हा स्तरावर लागणारा प्रदर्शन संचाचा खर्च (२ संच), आयईसी साहित्य इत्यादि | **रु . ८१,०००** |
| | **एकूण खर्च (अ + ब)** | **रु .३,२२,२००** |

इतर सर्व सूचनांचे पालन दि.२० मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावे.

**निधीची उपलब्धता -:**

या उपक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी येणारा खर्च नियोजन विभाग, मागणी क्र. ओ-३, मुख्य लेखाशीर्ष २५०५ -ग्रामीण रोजगार, ६०, इतर कार्यक्रम, ००१- रोजगार हमी योजना-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१) ०१)रोजगार हमी योजना, २६ जाहिरात व प्रसिध्दी (२५०५००२२) “ दत्तमत” या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तिय वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून करण्यात यावा.

सदर रु. ३,२२,२००/- (अक्षरी रुपये तीन लाख बावीस हजार दोनशे फक्त) इतका निधी योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी खर्च होणार असल्याने हा निधी आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र,नागपूर यांच्या खात्यात वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे . सदर निधी आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र,नागपूर यांनी नागपूर कोषागारातून आहरित करून पुणे जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना धनाकर्षाद्वारे वितरीत करावा. पुणे जिल्हाधिकारी यांनी दि. ३० जून, २०१५ रोजीपर्यंत उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर यांच्याकडे सादर करावे.

उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करुन आयुक्त, नरेगा यांनी अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३२४१५५११४७९१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: CN = Vimala R, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Planning Department
Date: 2015.03.25 14:32:04 +05'30'

**(आर. विमला)**
**उप सचिव (रोहयो), नियोजन विभाग**

प्रत,

१) मा. मंत्री (रोहयो व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
२) अ.मु.स. कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
३) प्रधान सचिव (ग्रा.वि.व.पं.रा.विभाग, मंत्रालय, मुंबई) यांचे स्वीय सहाय्यक,
४) सचिव (रोहयो व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक,
५) संचालक,मृदा परिक्षण व व्यवस्थापन, पुणे
६) विभागीय आयुक्त, पुणे,
७) आयुक्त, मग्रारोहयो आयुक्तालय, नागपूर
८) जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक,पुणे.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद,पुणे
१०) उप आयुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालय,पुणे
११) विभागीय सहसंचालक,कृषी,पुणे
१२) उप जिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
१३) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद,पुणे
१४) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे
१५) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा),महाराष्ट्र १ व २,मुंबई व नागपूर
१६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१७) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१८) सह संचालक, लेखा व कोषागारे, जिल्हा - पुणे
१९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-पुणे,
२०) उप सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) उप सचिव, रोहयो प्रभाग, मंत्रालय, मुंबई
२२) सर्व अवर सचिव, सहायक संचालक (लेखा), कार्यासन अधिकारी, रोहयो प्रभाग, मंत्रालय, मुंबई
२३) निवडनस्ती.